**(१४ पैकी शासन निर्णय क्र.१)**
**फौजदारी खटल्यातील सिध्दापराध प्रमाण वाढविण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत. प्रलंबित खटल्याबाबत पुनर्विलोकन करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः डीपीपी-२०१२/प्र.क्र.१०/पोल-१०

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १२ मे, २०१५

**वाचा :**

१. **विधी व न्याय विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण** २०११/**प्र.क्र.**१००/**का.**१२ **दिनांक** १७.०८.२०११
२. **विधी व न्याय विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण** २०११/**प्र.क्र.**१००/**का.**१२ **दिनांक** २१.११.२०११
३. **विधी व न्याय विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण** २०११/**प्र.क्र.**१००/**का.**१२ **दिनांक** २६/१२/२०१२

**प्रस्तावना :**

पोलीस ठाण्यामध्ये फौजदारी स्वरुपाचा गुन्हा दाखल झाल्यानंतर तपासाअंती न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करण्यात येते. तपासातील पुराव्याच्या आधारे न्यायालयामध्ये दोषारोपसिध्दीबाबत खटला चालू राहतो. राज्यातील १२९१ न्यायालयांमध्ये अशाप्रकारचे १८ लाखांपेक्षा अधिक गुन्ह्यांमध्ये वर्षानुवर्षे खटले प्रलंबित आहेत. सबळ पुरावा तसेच तांत्रिक व कायदेशिर बाबींतील त्रुटीमुळे दोषारोपसिध्दीचे प्रमाणही कमी आहे. वर्षानुवर्षे खटला सुरु राहिल्यामुळे फिर्यादी व साक्षीदार यांना नाहक त्रास सहन करावा लागतो . याबाबत विश्लेषण केल्यानंतर शासनाच्या असेही निदर्शनास आले आहे की, आरोपीचा बचाव करण्याचा आरोप किंवा टीका होऊ नये याकारणाकरिता सबळ पुरावा नसतानाही तपासी अधिकारी ब-याच प्रकरणांमध्ये दोषारोपत्र दाखल करतात तसेच, काही प्रकरणांमध्ये तपास पूर्ण झालेला नसतानाही तपासी अधिकारी अर्धवट दोषारोपपत्र दाखल करतात. यासर्व बाबींमुळे दोषारोपसिध्दीचे प्रमाण घटत आहे. मा.सर्वोच्च न्यायालय /मा.उच्च न्यायालय यांनी कोणते पुरावे ग्राह्य नाहीत याबाबत वेळोवेळी निदेश दिल्यामुळे सध्या प्रलंबित दोषारोप पत्रांचे पुनर्विलोकन होणे गरजेचे आहे. संदर्भाधिन शासन निर्णयान्वये विधि व न्याय विभागाने राज्यातील फौजदारी व दिवाणी स्वरुपाचे प्रकरणांपैकी जुनी व निरर्थक प्रकरणे काढून टाकण्याबाबतच्या

मार्गदर्शक सुचना दिल्या आहेत. सदरची प्रलंबित जुनी व निरर्थक प्रकरणे तत्परतेने निकाली काढण्याकरिता राज्यस्तरीय समिती व जिल्हा स्तरीय समिती स्थापन केली आहे. सबब राज्यातील प्रलंबित खटल्यांचे पुर्नविलोकन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्यातील प्रलंबित खटल्यांचे पुनर्विलोकन करुन जुनी व निरर्थक प्रकरणे काढून टाकण्याकरिता विधी व न्याय विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ मधील शासन निर्णयान्वये खालील प्रमाणे जिल्हास्तरीय समिती गठित करण्यात आली आहे:-

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश | - अध्यक्ष |
| २. | जिल्हाधिकारी तथा जिल्हादंडाधिकारी | - सदस्य |
| ३. | पोलीस आयुक्त/ पोलीस अधीक्षक | - सदस्य |
| ४. | सहाय्यक संचालक आणि सरकारी अभियोक्ता | - सदस्य |
| ५. | जिल्हा सरकारी वकिल | - सदस्य सचिव |

**२.** संदर्भाधीन विधी व न्याय विभागाच्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या निकषांनुसार जुने व निरर्थक खटले काढण्याबद्दल समिती राज्य शासनास शिफारस सध्या करीत आहे. त्याच धर्तीवर उपरोक्त परिच्छेद क्र.१ नमूद केलेली समिती सर्व प्रलंबित खटल्यांचे पुनर्विलोकन करुन सदर प्रलंबित खटले खालील ४ भागांमध्ये विभाजित करुन घेईल.

(अ) सीआरपीसी कलम २५८ प्रमाणे ज्या समन्स प्रकरणांमध्ये निकाल न लावता न्यायिक प्रक्रिया थांबविण्याची गरज आहे, असे खटले

(आ) ज्या खटल्यांमध्ये पुरावा नसल्यामुळे किंवा मा. सर्वोच्च न्यायालयाने किंवा मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निकालानुसार खटल्यांमध्ये असलेला पुरावा हा शाबीत होत नाही, असे खटले

(इ) ज्या खटल्यांच्या तपासामध्ये त्रुटी असल्यामुळे किंवा कागदपत्रे नसल्यामुळे गुन्हा शाबीत होऊ शकत नाही असे खटले.

(ई) ज्या खटल्यामध्ये गुन्हा शाबीत होऊ शकतो असे खटले

**३.** संबंधित सहाय्यक सरकारी अभियोक्ता यांनी वर्गवारी (अ) “सीआरपीसी कलम २५८ प्रमाणे ज्या समन्स प्रकरणांमध्ये निकाल न लावता न्यायिक प्रक्रिया थांबविण्याची गरज आहे, असे खटले” मध्ये सीआरपीसी कलम २५८ प्रमाणे पुढील कारवाई करेल.

**४.** सदर समितीने दिलेल्या शिफारशीनुसार गृह विभाग, विधि व न्याय विभागाचा सल्ला घेऊन, वर्गवारी (आ) “ज्या खटल्यांमध्ये पुरावा नसल्यामुळे किंवा मा. सर्वोच्च न्यायालयाने किंवा मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निकालानुसार खटल्यांमध्ये असलेला पुरावा हा शाबीत होत नाही, असे खटले” ची प्रकरणे सीआरपीसी ३२१ प्रमाणे मागे घेतील

५. सदर समितीने दिलेल्या शिफारशीनुसार गृह विभाग, विधि व न्याय विभागाचा सल्ला घेऊन, वर्गवारी (इ) "ज्या खटल्यांच्या तपासामध्ये त्रुटी असल्यामुळे किंवा कागदपत्रे नसल्यामुळे गुन्हा शाबीत होऊ शकत नाही असे खटले." ची प्रकरणे सीआरपीसी १७३ (८) प्रमाणे संबंधित तपासी यंत्रणेला पुढील तपासासाठी परत घेण्याची शिफारस करतील.

६. सदर समितीने दिलेल्या शिफारशीनुसार "वर्गवारी (ई) ज्या खटल्यामध्ये गुन्हा शाबीत होऊ शकतो असे खटले" मध्ये संबंधित सहाय्यक सरकारी अभियोक्ता यांनी अपराधसिद्धीकरिता न्यायालयामध्ये पाठपुरावा करावा.

७. उपरोक्त परिच्छेद क्र.१ मध्ये नमूद केलेल्या समितीला मदत करण्यासाठी आणि प्रलंबित खटल्यांची माहिती करून देण्यासाठी तालुका स्तरावर खालीलप्रमाणे एक छाननी समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| १.तालुक्यामधील वरिष्ठ प्रथम श्रेणी न्याय दंडाधिकारी | -अध्यक्ष |
| २.प्रत्येक जिल्ह्यातील सहाय्यक संचालक, अभियोग संचालनालय | -सदस्य |
| ३.उप विभागीय पोलीस अधिकारी | -सदस्य |
| ४.वरिष्ठ सहाय्यक सरकारी अभियोक्ता | -सदस्य |

८. उपरोक्त परिच्छेद क्र.(१) व परिच्छेद क्र.(७) मध्ये नमूद केलेली समिती महिन्याच्या पहिल्या आठवड्यामध्ये बैठक घेईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१२१७१३५७९२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Santaram Patil

Digitally signed by Dattatray Santaram Patil
DN: CN = Dattatray Santaram Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.12 18:27:43 +05'30'

**(द.सं.पाटील)**
उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य

४. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई
५. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
६. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
७. प्रधान सचिव व विधी परामर्श, विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, विशेष, मंत्रालय, मुंबई
९. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
१०. सर्व पोलीस आयुक्त
११. विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र
१२. सर्व अपर पोलीस महासंचालक
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. सर्व प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश
१५. सर्व पोलीस अधीक्षक
१६. संचालक, अभियोग, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. मा.राज्यमंत्री (शहरे) यांचे खाजगी सचिव
१८. मा.राज्यमंत्री (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
१९. उप सचिव (वि.शा.-२)
२०. सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. सर्व कार्यासने, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. निवडनस्ती